दक्षता जनजागृती सप्ताह
(Vigilance Awareness Week)साजरा करण्याबाबत.
**दिनांक ३ नोव्हेंबर, २००९ ते दिनांक ७ नोव्हेंबर, २००९.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
शासन परिपत्रक क्र.दजस-२००९/प्र.क्र.१२३/०९/११-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २९ ऑक्टोबर, २००९.

पहा :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-संकीर्ण-२००१/११२८/प्र.क्र.४३/०१/११-अ, दिनांक २२ ऑक्टोबर, २००१.

**परिपत्रक**

प्रतिवर्षी दक्षता जनजागृती सप्ताह (Vigilance Awareness Week) आयोजित करण्याचा निर्णय संदर्भाधीन आदेशान्वये घेण्यात आला आहे. यासंदर्भात केंद्रीय दक्षता आयोग, नवी दिल्ली यांच्या दिनांक २३ सप्टेंबर, २००९ च्या पत्राची प्रत सोबत जोडली आहे.

२. दक्षता जनजागृती सप्ताहाचे (Vigilance Awareness Week) आयोजन करण्यासाठी दिनांक २२.१०.२००१ च्या शासन निर्णयातील अ, ब, क, ड व ई या मुद्यांमध्ये नमूद केलेल्या सूचनांचा अवलंब करण्यात यावा. सदर शासन निर्णयाची प्रत सोबत जोडली आहे. त्याअनुषंगाने घ्यावयाच्या प्रतिज्ञा/शपथेचा नमुना तसेच मा.राज्यपाल महोदय आणि मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या संदेशाच्या प्रती सोबत जोडण्यात येत आहेत. विहित नमुन्यातील शपथ ग्रहणाचा एक कार्यक्रम विभागीय/कार्यालयीन स्तरावर दक्षता सप्ताहाच्या कालावधीत आयोजित करण्यात यावा.

३. या सप्ताहाच्या आयोजनासाठी स्वतंत्रपणे निधी उपलब्ध करुन देता येणार नसल्याने प्रत्येक कार्यालयाने त्यांच्याकडील उपलब्ध निधीतून खर्च करावयाचा आहे.

४. दक्षता जनजागृती सप्ताहाच्या आयोजनासंबंधीची जबाबदारी महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग यांच्यावर सोपविण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी या सूचना त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणाव्यात.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २००९१०२९१४१३४६००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(म. चिं. पाटील)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

राज्यपालाचे सचिव,
मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे मुख्य सचिव/सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
*महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
*महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती. * **पत्राने.**

009/VGL/049

Government of India

Central Vigilance Commission

*****

Satarkta Bhawan, Block-'A',
GPO Complex, INA,
New Delhi-110023
Dated the 23rd September 09

**Subject: Observance of Vigilance Awareness Week – 2009.**

The Central Vigilance Commission has decided that this year, the Vigilance Awareness Week would be observed by all the organizations, falling within the advisory jurisdiction of the Commission, from **November 3 to November 7, 2009**. The observance of the Vigilance Awareness Week should commence with the pledge (copy enclosed) on November 3, 2009 at 11.00 a.m.

2. The Commission is of the view that evolving and effectively implementing preventive techniques is the most important aspect of vigilance administration which includes transparency, accountability, fair-play, objectivity and timely response in dealing with matters relating to public administration. Vigilance Awareness Week should be used as a occasion to highlight awareness about effective preventive measures undertaken through system improvements and use of information technology to fight corruption.

3. The Commission has been strongly emphasising the role of preventive vigilance for quite some time through leveraging of technology by all Organisations/Departments in respect of all areas of functions. Towards this objective, all system and processes in place for deliverance of services are to be synchronised through use of technology like effecting e-payments to vendors, suppliers etc., publishing complete details of tenders on websites, e-procurement, reverse auction and providing information of status of applications to citizens/public etc. The initiatives taken in this regard by each Organisation/Department should be widely publicised during the Vigilance Awareness Week.

4. A report about the manner in which the Week was observed may be sent to the Central Vigilance Commission by December 1, 2009, by each organization.

5. This notification is also available on the Commission's website at http://cvc.nic.in.

23.9.09

**(K.S. Ramasubban)**
**Secretary**

To

(i) The Secretaries of all Ministries/Departments of Government of India
(ii) The Chief Secretaries of all States/Union Territories
(iii) The Comptroller & Auditor General of India
(iv) The Chairman, Union Public Service Commission
(v) Chief Executives of all PSUs/Banks/Organizations
(vi) All Chief Vigilance Officers in Ministries/Departments/PSEs/Public Sector Banks/Insurance Companies/Autonomous Organizations/ Societies

GR-200410271624410001-0100

दक्षता जनजागृती सप्ताह (Vigilance Awareness Week) साजरा करण्याबाबत.
दि.३१ ऑक्टोबर, ते ६ नोव्हेंबर

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२००१/११२८/प्र.क्र.४३/०१/११-अ,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक २२.१०.२००१.

**शासन निर्णय :-**

राज्यात गतवर्षी प्रथमच दि. ३१ ऑक्टोबर ते ४ नोव्हेंबर, २००० या कालावधीत "दक्षता जागरुकता सप्ताह" (Vigilance Awareness Week) आयोजित करण्यात आला होता. जनतेमध्ये भ्रष्टाचाराबाबत जागृती निर्माण करण्याच्या दृष्टीने सदर उपक्रम अत्यंत उपयुक्त सिध्द झाल्याने आता, प्रतिवर्षी सरदार वल्लभभाई पटेल यांच्या दि.३१ ऑक्टोबर या जन्मदिवसापासून एक आठवडा (दि. ३१ ऑक्टोबर ते ६ नोव्हेंबर) या कालावधीत "दक्षता जनजागृती सप्ताहाचे"(Vigilance Awareness Week) आयोजन करण्यात यावे असा निर्णय घेण्यात आला आहे.

दक्षता जनजागृती सप्ताहाचे आयोजन करताना पुढे नमूद केलेल्या मार्गाचा अवलंब करण्यात यावा.

अ) राज्य शासनाचे सर्व विभाग व त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ कार्यालय प्रमुख, राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम, सहकारी संस्था, स्वायत्त संस्थामार्फत सप्ताहाचे आयोजन करण्यात यावे.

ब) दि. ३१ ऑक्टोबर रोजी सकाळी ११.०० वाजता भ्रष्टाचार निर्मूलनाची शपथ घेऊन कार्यक्रमाचा प्रारंभ होईल. विभाग/ कार्यालय प्रमुख किंवा उपस्थितांपैकी ज्येष्ठतम अधिकारी सर्वांना शपथ देतील. (शपथेचा नमुना सोबत जोडला आहे.)

क) शपथ घेतल्यानंतर मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांनी या सप्ताहानिमित्त दिलेला संदेश उपस्थितांना वाचून दाखविण्यात येईल.

ड) या सप्ताहाच्या निमित्ताने मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांचा संदेश राज्यातील जनतेसाठी प्रसृत करण्यात यावा.

इ) या सप्ताहाच्या निमित्ताने पुढील कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

१. कार्यालयाच्या दर्शनी भागात व मोक्याच्या ठिकाणी भित्तीपत्रक, कापडी फलक लावणे.
२. कार्यालये/शाळा/महाविद्यालयांमध्ये भ्रष्टाचाराच्या दुष्परिणामांवर प्रकाश टाकण्यासाठी चर्चासत्रे/ वादविवाद स्पर्धा/व्याख्याने/निबंधस्पर्धा/कार्यशाळा यांचे आयोजन करणे.
३. विशेष पुस्तिकांचे (Special Journal) प्रकाशन करणे.
४. राज्यातील अशासकीय संघटना, स्वयंसेवी संस्था, सामान्य नागरीक यांना दक्षता जनजागृती मोहिमेत सहभागी होण्याचे आवाहन करणे.

कृ.मा.प.

५. केंद्रीय दक्षता आयोगाच्या http://www.cvc.nic.in या संकेतस्थळावर (Web-site) उपलब्ध साहित्याचा जनतेमध्ये वितरणासाठी उपयोग करणे.

याव्यतिरिक्त कार्यालयीन इमारतीच्या दर्शनी भागावर "भ्रष्टाचारासंबंधी काही माहिती असल्यास अगर लाच मागणाऱ्या लोकसेवकाबद्दल तक्रार असल्यास लाचलुचपत प्रतिबंध विभागाशी संपर्क साधावा" अशी सूचना व लाचलुचपत प्रतिबंध विभागाच्या स्थानिक कार्यालयाचा पत्ता आणि दूरध्वनी क्रमांक लिहिलेला कायमस्वरुपी फलक लावण्यात यावा.

या सप्ताहाच्या आयोजनासाठी स्वतंत्रपणे निधी उपलब्ध करुन देता येणार नसल्याने प्रत्येक कार्यालयाने त्यांच्याकडील उपलब्ध निधीतूनच खर्च करावा.

दक्षता जनजागृती सप्ताहाच्या आयोजनासंबंधीची जबाबदारी महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंध विभाग यांच्यावर सोपविण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(बी.के.अग्रवाल)
शासनाचे अपर मुख्य सचिव.

प्रति,

राज्यपालांचे प्रधान सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान सभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान परिषद सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* आयुक्त राज्य निवडणूक आयोग, मुंबई .
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,
सा.प्र.विभागातील सर्व प्रशासकीय कार्यासने,
निवड नस्ती.

* पत्राने.

## PLEDGE

WE, THE PUBLIC SERVANTS OF INDIA, DO HEREBY SOLEMNLY PLEDGE THAT WE SHALL CONTINUOUSLY STRIVE TO BRING ABOUT INTEGRITY AND TRANSPARENCY IN ALL SPHERES OF OUR ACTIVITIES. WE ALSO PLEDGE THAT WE SHALL WORK UNSTINTINGLY FOR ERADICATION OF CORRUPTION IN ALL SPHERES OF LIFE. WE SHALL REMAIN VIGILANT AND WORK TOWARDS THE GROWTH AND REPUTATION OF OUR ORGANISATION. THROUGH OUR COLLECTIVE EFFORTS, WE SHALL BRING PRIDE TO OUR ORGANISATIONS AND PROVIDE VALUE BASED SERVICE TO OUR COUNTRYMEN. WE SHALL DO OUR DUTY CONSCIENTIOUSLY AND ACT WITHOUT FEAR OR FAVOUR.

## प्रतिज्ञा

आम्ही भारताचे लोकसेवक, याद्वारे गांभीयपूर्वक अशी प्रतिज्ञा करतो की, आम्ही आमच्या सर्व कार्यक्षेत्रात सचोटी व पारदर्शकता आणण्याचा सातत्याने आटोकाट प्रयत्न करु. आम्ही अशीही प्रतिज्ञा करतो की, जीवनाच्या सर्व क्षेत्रांमध्ये भ्रष्टाचाराचे निर्मूलन करण्यासाठी आम्ही सर्वतोपरी कार्य करु. आम्ही दक्ष राहून आमच्या संघटनेच्या वृध्दीसाठी व लौकीकासाठी कार्य करु. आमच्या सामुदायिक प्रयत्नांनी आम्ही आमच्या संघटनांना अभिमान प्राप्त करुन देऊ आणि आमच्या देशबांधवांना मूल्याधिष्ठीत सेवा पुरवू. आम्ही आमचे कर्तव्य निष्ठापूर्वक पार पाडू आणि भय किंवा पक्षपात याविना कार्य करु.

S. C. JAMIR
GOVERNOR OF MAHARASHTRA





RAJ BHAVAN
MUMBAI 400 035

12 October 2009

# MESSAGE

Corruption is one of the largest factors that has retarded the pace of development in India. It is a matter of serious concern that corruption is becoming all-pervasive and creeping into all spheres of life. In today's age of globalization when entrepreneurship and private economic activity are intertwined with economic prosperity, corruption could act as a serious impediment to the nation's progress and stability. There is a strong need to wage a war against corruption by each one of us, at the individual level and at the collective ievel.

The Vigilance Awareness Week offers us an opportunity to think of ways to bring greater transparency and accountability in our work, remove unnecessary procedures and practices from our organisations and provide efficient services to the people.

On the occasion of 'Vigilance Awareness Week' being observed by Government of Maharashtra from November 3 to 7, 2009, let us resolve that we shall not remain indifferent to corruption or tolerate it or indulge in it.

**(S. C. Jamir)**








**CHIEF MINISTER**

**MAHARASHTRA**

२० ऑक्टोबर २००९

## "दक्षता जनजागृती" सप्ताहानिमित्त संदेश

दरवर्षीप्रमाणे यावर्षीही राज्यात दि. ३ ते ११ नोव्हेंबर २००९ या कालावधीत दक्षता जनजागृती सप्ताह आयोजित करण्यात आल्याचे समजून आनंद वाटला.

भ्रष्टाचार ही आपल्या समाजाला लागलेली कीड आहे. भ्रष्टाचारामुळे आर्थिक विकासाचे लाभ समाजातील शेवटच्या घटकापर्यंत पोहोचत नाहीत. खाजगी आणि सरकारी क्षेत्रात काम करणा-या प्रत्येक अधिकारी आणि कर्मचा-याने भ्रष्टाचारापासून दूर राहण्याचा निश्चय "दक्षता जागृती" सप्ताहानिमित्त केला पाहिजे. त्याचप्रमाणे भ्रष्टाचाराला उत्तेजन मिळू नये यासाठी प्रत्येकाने प्रयत्न केला पाहिजे आणि दक्ष राहिले पाहिजे.

भ्रष्टाचार हा विकास कामातील सर्वात मोठा अडथळा आहे. यामुळे समाजाचे होणारे नुकसान टाळण्यासाठी दक्षता जनजागृतीसारखे उपक्रम केवळ आठवडाभर न राबविता वर्षभर कायम राबविले गेले पाहिजेत. याकामी खाजगी, स्वयंसेवी तसेच सरकारी क्षेत्रातील अधिकारी/कर्मचारी आणि सुजाण नागरिक मोठी मदत करू शकतात.

भ्रष्टाचाराला आळा घालून शासकीय कामकाजात पारदर्शकता आणण्यासाठी शासन प्रयत्न करीत आहे. यासाठी अनेक ठिकाणी आवश्यक असणारे परवाने व प्रमाणपत्र मिळविण्याची पद्धत अधिक सोपी केली आहे. बहुतांशी शासकीय कार्यालयात संगणकाच्या सहाय्याने सेवा सुरू केल्याने आवश्यक ती कागदपत्रे, प्रमाणपत्रे आणि शासन निर्णयांची माहिती लोकांना सहजरित्या उपलब्ध होत आहे.

लाच घेणे हा जसा गुन्हा आहे तसेच लाच देणे हा ही गुन्हा आहे. म्हणूनच मी भ्रष्टाचार करणार नाही आणि भ्रष्टाचाराला उत्तेजनही देणार नाही अशी प्रतिज्ञा प्रत्येकाने करावी असे माझे या सप्ताहाच्या निमित्ताने आवाहन आहे.

**( अशोक चव्हाण )**